**कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालयाच्या अधिपत्याखालील गट-क व गट-ड या संवर्गातील पदे पदोन्नतीने भरण्याकरीता विभागीय पदोन्नती समिती गठीत करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता नाविन्यता विभाग,**
शासन निर्णय क्रमांक : इएसई-२०२५/प्र.क्र.०३ /प्रशा-२,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगूरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २८ फेब्रुवारी, २०२५

**संदर्भ :** १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१८/प्र.क्र.१५९/कार्या-१२, दि. १.०८.२०१९.
२) रोजगार व स्वयंरोजगार विभाग, शासन निर्णय क्र. इएसई-२००८/प्र.क्र.१५/प्रशा-२, दिनांक २१ फेब्रुवारी, २००८.
३) आयुक्त, कौशल्य विकास,रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, नवी मुंबई यांचा प्रस्ताव जा.क्र. कौविरोवउआ-२/आस्था/अराप/(३७/२०२४)६८६५, दि. ५.१२.२०२४

**<u>शासन निर्णय :-</u>**

कौशल्य विकास,रोजगार व उद्योजकता आयुक्तालयातील गट-क व गट-ड संवर्गातील पदे पदोन्नतीने भरण्याकरीता व सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ देण्याकरीता विभागीय पदोन्नती समितीची स्थापना संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आली आहे.

२. राज्य शासकीय अधिकारी/कर्मचारी यांना पदोन्नती देण्याकरीता अनुसरावयाची कार्यवाहीबाबतची एकत्रित मार्गदर्शक तत्वे सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्र. १ च्या शासन निर्णयान्वये विहित केली आहेत. सदर शासन निर्णयातील तरतुदीनुसार संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय अधिक्रमित करुन कौशल्य विकास,रोजगार व उद्योजकता आयुक्तालयातील गट-क व गट-ड या संवर्गातील पदे पदोन्नतीने भरण्याकरीता खालीलप्रमाणे विभागीय पदोन्नती समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १ | आयुक्त,<br>कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, कोकण भवन, नवी मुंबई. | अध्यक्ष |
| २ | उप आयुक्त ,<br>कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय, कोकण भवन, नवी मुंबई. | सदस्य |
| ३ | कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालयातील गट-अ मधील अधिकारी (मागासवर्गीय प्रतिनिधी) | सदस्य |
| ४ | सहायक आयुक्त,<br>कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालय,<br>कोकण भवन, नवी मुंबई. | सदस्य सचिव |

३. विभागीय पदोन्नती समितीमध्ये मागास प्रवर्गाचे प्रतिनिधित्व करणारा एक सदस्य असावा. असा सदस्य नसल्यास समितीच्या अध्यक्षांच्या सहमतीने मागास प्रवर्गाचे प्रतिनिधीत्व करण्याकरिता एका अधिका-याचा निमंत्रित सदस्य म्हणून समावेश करावा.

४. सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशातील तरतुदी तसेच संदर्भ क्र. १ येथील शासन निर्णयातील तरतुदी, सेवा प्रवेश नियम, अधिकारी/कर्मचारी यांची अद्ययावत सेवाज्येष्ठता सूची, अद्ययावत गोपनीय अहवाल, विहीत प्रमाणित केलेली बिंदूनामावली इ. बाबी विचारात घेवून विभागीय पदोन्नती समितीने कार्यवाही करणे आवश्यक आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२५०२२८१५१३३७२८०३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRADEEP SAHEBRAO SHIVTARE

Digitally signed by PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILL EMPLOYMENT ENTREPRENEURSHIP AND INNOVATION DEPARTMENT, 2.5.4.20=12a2d958f75709e9720b38b5349dae16ef85e08a91e69f77d8b94222ab9dc13c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=415BAA8242ED5D99644FE1533246B0A85DC3D52848FB6CE23F47DAF8D647AE5A, cn=PRADEEP SAHEBRAO SHIVTARE
Date: 2025.02.28 15:14:26 +05'30'

**(प्रदीप सा. शिवतरे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा.मंत्री (कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता ) यांचे खाजगी सचिव,
२) अपर मुख्य सचिव, कौशल्य,रोजगार,उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.
३) आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता, कोकण भवन, नवी मुंबई.
४) सह सचिव, (प्रशा-२ ) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) उप सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) उप आयुक्त, सर्व विभागीय आयुक्तालये, (कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता आयुक्तालयामार्फत)
७) निवडनस्ती (प्रशा.२)